**आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (IFAD) सहाय्यित समन्वयित कृषि विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता सन २०१४-१५ करीता रु.१२३२.०० लाख निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

शासन निर्णय क्रमांकः बासप्र-०११५/प्र.क्र.३/२१-स
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १६ जानेवारी, २०१५

**वाचा -**

**१) शासन निर्णय क्रमांकः बासप्र-०७१३/प्र.क्र.११८/२१-स, दि.१३.८.२००९**
**२) प्रकल्प संचालक, समन्वयित कृषि विकास प्रकल्प, अमरावती यांचे क्र.सी.ए.आय.एम./ पी.एम.यु./२०१३-१४/१८५३, दि.७.१२.२०१४ चे पत्र**

**प्रस्तावना --**

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (IFAD)या संस्थेच्या सहकार्याने विदर्भातील शेतकऱ्यांच्या आत्महत्यांनी ग्रस्त असलेल्या सहा जिल्हयांमध्ये समन्वयित कृषि विकास प्रकल्प (CAIM) राबविण्यात येत असून प्रकल्प दि.४.१२.२००९ पासून कार्यान्वित झाला आहे. सन २०१४-१५ करीता प्रथमत: रु.२३६१ लक्ष रकमेचा निधी सदर प्रकल्पाकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. यापैकी दि.१२.८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये रु.११२९ लक्ष रकमेचा निधी वितरीत करण्यात आला आहे. प्रकल्पांतर्गत उपलब्ध असलेल्या तरतुदीप्रमाणे सन २०१४-१५ करीता प्रकल्प कार्यालयाने तयार केलेल्या वार्षिक कार्य नियोजन व अंदाजपत्रकाच्या (AWPB) अनुषंगाने सन २०१४-१५ मध्ये प्रकल्पांतर्गत हाती घ्यावयाच्या कामाकरीता (संस्थात्मक क्षमता विकास व भागीदारी, पणन साखळी आणि शाश्वत शेती आणि प्रकल्प व्यवस्थापन या घटकांवरील खर्च) प्रकल्प व्यवस्थापन यंत्रणा, अमरावती यांचेमार्फत चालू वर्षी निधी उपलब्ध करुन देणेबाबत प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने प्रकल्पासाठी शिल्लक असलेला रु.१२३२ लक्ष रकमेचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने वित्त विभागाने ६० टक्के रकमेची अट शिथिल करुन १०० टक्के निधी वितरीत करण्यास मान्यता दिल्यानुसार शिल्लक रक्कम रु.१२३२ लक्ष इतक्या रकमेचा निधी वितरीत करण्यासाठी शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय : --**

प्रकल्प संचालक, समन्वयित कृषि विकास प्रकल्प, अमरावती यांना समन्वयित कृषि विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता सन २०१४-१५ साठी रु.१२३२.०० लाख (रुपये बारा कोटी बत्तीस लाख फक्त ) इतक्या रकमेचा निधी उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२.  सदर रु.१२३२.०० लाख रकमेचा खर्च प्रकल्पाच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ करीता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष | मंजूर निधी | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | मागणी क्र.व्ही-२<br>मुख्य लेखाशिर्ष<br>२४३५ - इतर कृषिविषयक कार्यक्रम<br>(०१), पणन आणि गुणवत्ता नियंत्रण<br>(१९९), इतर अशासकीय संस्थांना सहाय्य<br>राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) बाहय सहाय्यित प्रकल्प<br>(०१)(०३) आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी सहाय्यित समन्वयित कृषि विकास प्रकल्प (राज्य योजना) (राज्य हिस्सा)<br>(२४३५ ००३५) ३२, अंशदाने | २१.००<br>(रुपये एकवीस लाख फक्त) | श्री.रा.स.अटक, उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ | श्रीमती अ.अ.चुरी, कार्यासन अधिकारी, (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ |
| २ | मागणी क्र.व्ही-२<br>मुख्य लेखाशिर्ष<br>२४३५ - इतर कृषिविषयक कार्यक्रम<br>(०१), पणन आणि गुणवत्ता नियंत्रण<br>(१९९), इतर अशासकीय संस्थांना सहाय्य<br>राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) बाहय सहाय्यित प्रकल्प<br>(०१)(०४) आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी सहाय्यित समन्वयित कृषि विकास प्रकल्प (राज्य योजना) (बाहय हिस्सा)<br>(२४३५ ००४४) ३२, अंशदाने | १२११.००<br>(रुपये बारा कोटी अकरा लाख फक्त) | | |
| | **एकूण** | **१२३२.००<br>(रुपये बारा कोटी बत्तीस लाख फक्त)** | | |

३.  उपरोल्लिखित निधी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करुन त्याचे वितरण करण्यासाठी श्री.रा.स.अटक, उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व श्रीमती अ.अ.चुरी , कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग

विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

४. या प्रकल्पाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी RTGS सुविधेव्दारे प्रकल्पाच्या बँक खात्यावर जमा करावयाचा असून त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे

| | |
|---|---|
| Name of the account | MSAMB CAIM PROGRAMME PMU AMRAVATI |
| Name of the Bank | State Bank of India |
| Name of the Branch | **State Bank of India, Camp Road, Amravati, Maharashtra - 444 602.** |
| Account No. | **30991681907** |
| IFSC Code | **SBIN0003866** |
| Bank Branch Code | **0003866** |
| MICR Number | **444002976** |

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या निधीचा विनियोग प्रकल्प अहवालाप्रमाणे तसेच संदर्भ क्र.२ येथे नमूद प्रस्तावांतर्गत समाविष्ट केलेल्या बाबींकरीताच मंजूर करण्यात आला असून सदर निधी याच कारणासाठी व प्रकल्पांतर्गत मंजूर घटकांवरच करण्यात येत असल्याबाबत प्रकल्प संचालक, समन्वयित कृषि विकास प्रकल्प, अमरावती यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्परतेने सादर करावे.

६. हे आदेश नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.६१५/१४ /व्यय-२, दि.१२.१.२०१५ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११६१५३६१७७३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Baburao Tumbare

Digitally signed by Sunil Baburao Tumbare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Corporation marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Baburao Tumbare
Date: 2015.01.16 15:44:52 +05'30'

**सु. बा. तुंबारे**
अवर सचिव

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव ( पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

२. प्रकल्प संचालक (CAIM) तथा उपायुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती

३. राज्य संपर्क अधिकारी, प्रकल्प अग्रणी यंत्रणा (CAIM), महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), नागपूर
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प-१३/ऋण व हमी), मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई
१०.कक्ष अधिकारी(रोखशाखा/१७-स),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई
११.निवडनस्ती